**मा. श्री. रविंद्र वायकर, विधानसभा सदस्य यांची मुख्यमंत्री सचिवालयात प्रमुख समन्वयक पदावर नियुक्ती करून त्यांना मंत्री पदाचा दर्जा देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआयएन-१२२०/प्र.क्र.१ (भाग-३)/२१,**
मंत्रालय, मुख्य इमारत, २ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावनाः-**

मा. मुख्यमंत्री यांना मंत्रालयात भेटण्याकरिता संपूर्ण राज्यातून मोठ्या प्रमाणावर नागरिक निवेदने/तक्रारी/ गा-हाणी घेवून येत असतात. अशा भेटण्याकरीता येणा-या सर्व नागरिकांची निवेदने/तक्रारी/गा-हाणी समजावून घेवून मार्गी लावण्याकरिता मुख्यमंत्री सचिवालयात जेष्ठ व अनुभवी व्यक्तीची आवश्यकता आहे. तसेच जिल्हास्तरावर व विभाग स्तरावर लोकांच्या तक्रारी/गा-हाणी व सूचना प्राप्त करून घेण्याकरिता विभागीय मुख्यमंत्री सचिवालय सुरू करण्यात आले आहे. त्याची व्याप्ती जिल्ह्यापर्यंत वाढविण्यात येणार आहे. या सर्व कार्यालयांच्या समन्वयासाठी देखील प्रशासकीय अनुभव असणारी जेष्ठ व्यक्तीची नेमणूक करणे आवश्यक आहे. या सर्व बाबींचा विचार करता मुख्यमंत्री कार्यालयामध्ये प्रमुख समन्वयक म्हणून मा. श्री. रविंद्र वायकर, विधानसभा सदस्य यांची नियुक्ती करणे व त्यांना मंत्री पदाचा दर्जा देवून त्याअनुषंगाने अनुज्ञेय व इतर सोयी सुविधा पुरविण्याची बाब विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

मुख्यमंत्री कार्यालयामध्ये मा. मुख्यमंत्री यांना मंत्रालयात भेटण्याकरिता येणा-या नागरिकांची निवेदने/ तक्रारी/ गा-हाणी समजावून घेवून मार्गी लावण्याकरिता तसेच जिल्हा व विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या मुख्यमंत्री सचिवालय याचे समन्वय करण्यासाठी मुख्यमंत्री कार्यालयात मा. श्री. रविंद्र वायकर, विधानसभा सदस्य यांची **प्रमुख समन्वयक** म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच मा. श्री. रविंद्र वायकर, विधानसभा सदस्य यांना मंत्री पदाचा दर्जा देण्यात येत आहे.

२. मा. श्री. रविंद्र वायकर, विधानसभा सदस्य यांना मंत्री पदाचा दर्जा देण्यात आल्याने त्यांना खालीलप्रमाणे सेवा सुविधा अनुज्ञेय राहतील.

१) प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांच्या कामकाजासाठी कार्यालय.
२) प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांच्या कामकाजासाठी शासकीय वाहन.
३) प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांच्या कामकाजासाठी कार्यालयीन/निवासी दूरध्वनी.
४) मुख्यमंत्री सचिवालयातील विशेष कार्य कक्षातील ५ प्रमुख पदांसह या कक्षाचे कामकाज मा. श्री. रविंद्र वायकर प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा ), मुख्यमंत्री सचिवालय यांच्याकडे सोपविण्यात येत आहे. मा. श्री. रविंद्र वायकर प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा ), मुख्यमंत्री सचिवालय यांच्या कार्यालयाकरीता आणखी ५ सावधी पदे नव्याने निर्माण करून त्या पदावर अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती करण्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

५) महाराष्ट्र मंत्री वेतन व भत्ते अधिनियम-१९५६ व त्यामधील सुधारणांनुसार मंत्री पदासाठी देण्यात येणारे वेतन, दैनिक व बैठक भत्ता, वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती.

६) महाराष्ट्र मंत्री यांचे भत्ते नियम-१९७७ व त्यामधील सुधारणांनुसार मंत्री पदासाठी देण्यात येणारे प्रवास भत्ते

३. वरील सवलती शासन मान्यतेने एक खास बाब म्हणून मंजूर करण्यात येत आहेत.

४. प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांचे स्वत:चे वेतन, भत्ते व प्रवास भत्त्याच्या देयकांसाठी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून अवर सचिव, सा.प्र.वि./२१ (रोख) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सह सचिव, सा.प्र.वि./२१,रोख यांना प्रवास भत्त्याच्या व अन्य देयकांवर "नियंत्रक अधिकारी" म्हणून प्रतिस्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांच्या वेतन व भत्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक ए-१,२०१३- (२०१३००१७)" या लेखाशिर्षाखाली त्या-त्या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात येईल.

६. प्रमुख समन्वयक (मंत्री दर्जा) यांच्या कार्यालयीन अधिकारी/कर्मचारी वृंदावरील वेतन,प्रवास खर्च व कार्यालयीन खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. ए-४-२०५२, सचिवालय सर्वसाधारण सेवा (००) (०३), मंत्र्यांचा स्वीय कर्मचारी वर्ग (२०५२००३४) याखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६७/२०२०/व्यय-४ दि.१०.०२.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००२१११४०९५५०१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2020.02.11 14:12:19 +05'30'

**( सो. ना. बागुल )**
**सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) प्रधान सचिव/सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव/सचिव, उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) खाजगी सचिव,सर्व मंत्री/राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
८) सामान्य प्रशासन विभाग/का.१०, २१-अ, २२, २३-अ, २५, ३९, मंत्रालय, मुंबई.
९) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) सामान्य प्रशासन विभाग/का.२१ (रोख), मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग/व्यय-४, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (का-२१ आस्था).